**संरक्षित वनांचे लगत क्षेत्रातील गावात अनुसूचित जातीच्या लाभार्थ्यांना LPG कुकींग गॅस व बायोगॅस, दुभत्या जनावरांसाठी अनुदान व वृक्षलागवडीचे संरक्षण करणे या योजनेअंतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये निधी वितरण करणेबाबत. (लेखाशिर्ष २४०६ ए८०१)**

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२४/प्र.क्र.३९/अर्थसंकल्प**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- १८ मार्च, २०२५.

**वाचा :-** १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४

२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४, दि.१२.०२.२०२५.

३)उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाची ई ऑफीस नस्ती क्र.R&FD-५१०७६(७६)/१/२०२५-MRF(DESKF२).

**शासन निर्णय :-**

संरक्षित वनांचे लगत क्षेत्रातील गावात अनुसूचित जातीच्या लाभार्थ्यांना LPG कुकींग गॅस व बायोगॅस, दुभत्या जनावरांसाठी अनुदान व वृक्षलागवडीचे संरक्षण करणे या योजनेअंतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, ०१-वनीकरण, ७८९ अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०१) संरक्षित वनक्षेत्रातील कुटूंबांना स्वयंपाकाचा गॅस व सोलर कुकर यांचे वितरण (कार्यक्रम) (२४०६ ए८०१), ५०- इतर खर्च या लेखाशिर्षाखाली रु.३७.२० लाख इतका नियतव्यय मंजूर आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०१.०४.२०२४, दि.२५.०७.२०२४ व दि.१२.०२.२०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरीणाची कार्यप्रणाली ठरवून दिलेली असून कार्यक्रमांतर्गत योजनांच्या ६० टक्के मर्यादेत खर्चासाठी नियोजनात्मक सूचना केलेल्या आहेत. उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या प्रस्तावास अनुसरुन संरक्षित वनक्षेत्रातील कुटूंबांना स्वयंपाकाचा गॅस व सोलर कुकर यांचे वितरण या योजनेसाठी वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता अर्थसंकल्पीत निधीपैकी (२४०६ ए८०१), ५०- इतर खर्च या लेखाशिर्षाखाली रु.३७.२० लाख इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अ.मु.स (वने), महसुल व वन विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र,

संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व महसूल व वन विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

४. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१.४.२०२४, दि.२५.०७.२०२४ व दि.१२.०२.२०२५ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१.०४.२०२४, दि.२५.७.२०२४ व दि.१२.०२.२०२५ रोजीच्या परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच वित्त विभागाने ऑनलाईन नस्तीवर दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३१८१६००४६३४२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2025.03.18 16:01:46 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) अ.मु.स., महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) संचालक, उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय इमारत, २रा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई
४) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
५) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
६) वित्त विभाग (अर्थ-७/व्यय-४), मंत्रालय, मुंबई
७) महसुल व वन विभाग (का.-२), मंत्रालय, मुंबई
८) निवडनस्ती (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग